**“नगरपरिषद क्षेत्रातील यात्रास्थळांच्या विकास कार्यक्रमासाठी सहायक अनुदान” योजनेअंतर्गत निधी वितरीत करण्याबाबत.**

<u>सन २०१५-१६ साठी लेखाशिर्ष (२२१७ ०९५१) खाली रक्कम रू. ६.८० कोटी</u>

**महाराष्ट्र शासन**
**नगर विकास विभाग**
**शासन निर्णय क्रमांक-नपाया-२०१७/प्र.क्र.२५ /नवि-१६**
**मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.**
**दिनांक :- २४ मार्च, २०१७.**

**वाचा :-** (१) नगर विकास विभाग शासन निर्णय क्रमांक संकिर्ण-१०९७/६८४/ नवि-१८ दिनांक २६ फेब्रुवारी,१९९७.

(२) नगर विकास विभाग शासन निर्णय क्रमांक संकिर्ण-१०९७/२०५५/ नवि-१८ दिनांक २५ ऑगस्ट,१९९७.

(३)नगर विकास विभाग शासन निर्णय क्रमांक तिक्षेवि-२००२/ प्र.क्र.८९/२००२/नवि-१८ दिनांक २४ ऑगस्ट,२००४.

(४)वित्त विभागाचे शासन परिपत्रक क्रमांक अर्थसं-२०१६/प्र.क्र.८९ /अर्थ-३,दिनांक २० एप्रिल,२०१६.

(५)वित्त विभागाचे शासन परिपत्रक क्रमांक संकिर्ण-२०१६/प्र.क्र.३१ /कोषा.प्रशा.-५ ,दिनांक १० मे,२०१६.

(६)वित्त विभागाचे शासन परिपत्रक क्रमांक अर्थसं-२०१७/प्र.क्र.८९ /अर्थ-३,दिनांक ८ फेब्रुवारी,२०१७.

**प्रस्तावना :-**

राज्यातील अनेक तीर्थक्षेत्रांच्या/यात्रास्थळांच्या ठीकाणी भेट देणा-या यात्रेकरूंची संख्या फार मोठ्या प्रमाणात असते.ब-याच तीर्थक्षेत्रांच्या ठीकाणी वर्षामधील काही ठराविक कालावधीमध्ये मोठ्या संख्येने यात्रेकरू भेट देतात.अशी तीर्थक्षेत्रे/यात्रास्थळे ज्या स्थानिक नागरी संस्थांच्या क्षेत्रात आहेत त्यांना अशा मोठ्या संख्येने येणा-या यात्राकरूंना पुरेशा प्रमाणात नागरी मुलभूत सोई-सुविधा पुरविण्याच्या दृष्टीने सहायक अनुदान देण्यात येते.संदर्भाधीन क्र. (१),(२) व (३) येथील शासन निर्णयान्वये सदर योजनेचे निकष निश्चित करण्यात आले आहेत.संदर्भाधीन क्र. (४), (५) व (६) येथील वित्त विभागाच्या मार्गदर्शक सूचनांनुसार “नगरपरिषद क्षेत्रातील यात्रास्थळांच्या विकास कार्यक्रमासाठी सहायक अनुदान” योजनेअंतर्गत “अर्थसंकल्प वितरण प्रणालीवर” निधी वितरीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**<u>शासन निर्णय :-</u>**

"नगरपरिषद क्षेत्रातील यात्रास्थळांच्या विकास कार्यक्रमासाठी सहायक अनुदान" योजनेअंतर्गत संबधित नगरपरिषदांना **<u>एकूण रक्कम रु. ६,८०,१५,८८६/- (अक्षरी रक्कम रुपये सहा कोटी ऐंशी लक्ष पंधरा हजार आठशे शहाऐंशी मात्र)</u>** इतका निधी सोबत जोडलेल्या अनुसूचीनुसार वितरीत करण्यास खालील अटी व शर्तींच्या अधीन राहून या शासन निर्णयान्वये मंजुरी देण्यात येत आहे.

२. सदर प्रकल्प खर्चाचा राज्य शासनाचा हिस्सा सोबत जोडलेल्या अनुसूचीनुसार राहणार आहे. सदर प्रकल्पाअंतर्गत निश्चित करण्यात आलेल्या कामांना सोबत जोडलेल्या अनुसूचीमधील रकाना क्र. (७) मधील मंजूर रकमेच्या मर्यादेत सक्षम प्राधिका-यांची तांत्रिक व प्रशासकीय मान्यता प्राप्त झाली असल्याची खातरजमा संबधित जिल्हाधिकारी यांनी करून घ्यावी.

३. सदर प्रकल्पाअंतर्गतच्या कामांसाठी कार्यान्वयन यंत्रणा संबधित नागरी स्थानिक स्वराज्य संस्था राहील.

४. सदर प्रकल्पाअंतर्गतच्या कामांच्या "ई-निविदा" अंती प्रकल्प खर्च निश्चित करण्यात यावा. सदरचा प्रकल्प खर्च हा तांत्रिक व प्रशासकीय मान्यता देण्यात आलेल्या प्रकल्प खर्चापेक्षा जास्तीचा असल्यास, अशा जास्तीच्या खर्चासाठी कुठल्याही स्वरुपात अतिरिक्त अनुदान शासनाकडून उपलब्ध करुन दिले जाणार नाही.

५. "ई-निविदा" अंतीचा प्रकल्प खर्च हा तांत्रिक व प्रशासकीय मान्यता देण्यात आलेल्या प्रकल्प खर्चापेक्षा कमी असल्यास, सदर कमी झालेल्या खर्चाच्या राज्य शासन हिस्स्याची रक्कम शासनास जमा करावी. सदरची जबाबदारी आहरण व संवितरण अधिकारी यांची राहील.

<u>६. जिल्हाधिकारी, यांची जबाबदारी खालीलप्रमाणे राहील:-</u>

(अ) सदर प्रकल्पाअंतर्गतची कामे ही सार्वजनिक मालकीच्या / देवस्थानच्या ठिकाणीच करावीत, कामाचे स्वरुप सार्वजनिक असावे, तसेच त्यामुळे सर्वसमावेशक नागरिकांच्या प्राथमिक सोयी सुविधांमध्ये भर पडणार आहे याची पुन्हा खातरजमा करणे व कुठल्याही खाजगी स्वरुपाच्या कामांना मान्यता देण्यात आली नसल्याची खातरजमा करणे.

(ब) सदर प्रकल्पाअंतर्गतची कामे सबंधित शहराच्या विकास नियंत्रण नियमावली व विकास आराखडयाशी सुसंगत असल्याची खातरजमा करणे.

(क) सदर प्रकल्पाअंतर्गतच्या कामांना "ई-निविदा" कार्यप्रणालीचा अवलंब करणे बंधनकारक राहील.याबाबत सार्वजनिक बांधकाम विभाग तसेच शासनाने निर्गमित केलेल्या अद्यावत मार्गदर्शक सूचनांचे काटेकोरपणे पालन करण्यात यावे. "ई-निविदा" कार्यप्रणालीचा अवलंब करण्यात येत असल्याची खातरजमा करणे.

(ड) सदर प्रकल्पाअंतर्गत उपलब्ध करून दिलेला निधी त्याच उद्दिष्टासाठी खर्च करण्यात येत असल्याचे, काम गुणवत्तेनुसार झाले आहे किंवा कसे तसेच मंजूर कामावरच मंजूर निधी खर्च झाला आहे किंवा कसे हे पाहणे.

(इ) सदर प्रकल्पाअंतर्गतच्या कामावर करण्यात येणा-या खर्चामुळे आदर्श आचारसंहितेचा भंग होणार नाही हे पाहणे.

(ई) निधी खर्च करताना तो विहीत कार्यपध्दती अनुसरुन सर्व वित्तीय कायदे व नियमांचे तसेच विहीत प्रक्रियेचे अवलंबन करण्यात यावे. निधी खर्च करण्याबाबत वित्त विभागाकडून वेळोवेळी निर्गमित करण्यात आलेल्या शासन निर्णयातील सूचनांचा व वित्तीय अधिकारांच्या मर्यादेत (Financial Power) भंग होणार नाही तसेच, कुठलाही शासन नियम/अधिकाराचा भंग होणार नाही हे पाहणे.

७. कार्यान्वयन यंत्रणेची जबाबदारी खालीलप्रमाणे राहील:-

(अ) सदर प्रकल्पाअंतर्गत दुरूस्तीची तथा परिरक्षणाची कामे हाती घेण्यात येत नाहीत हे पाहणे.

(ब) सदर प्रकल्पाअंतर्गतची कामे सुरू करण्यापुर्वीच्या स्थितीचे व काम झाल्यानंतरच्या कामाचे चित्र (Photograph) काढून ठेवणे व मागणीनुसार सादर करणे.

(क) सदर प्रकल्पाअंतर्गतच्या कामांचे त्रयस्थ पक्षाकडून लेखापरिक्षण करून घेणे कार्यान्वयन यंत्रणेस बंधनकारक राहील.

८. यापुर्वी या योजनेखाली झालेल्या खर्चाबाबतची उपयोगिता प्रमाणपत्रे व सदर शासन निर्णयान्वये उपलब्ध करून दिलेल्या निधीचे उपयोगिता प्रमाणपत्र विहित प्रपत्रात संबधित नागरी स्थानिक स्वराज्य संस्थेकडून उपलब्ध करून घेऊन, संबंधित महालेखापाल कार्यालयाकडे सादर करण्याची जबाबदारी संबधित जिल्हाधिकारी यांची राहील.तसेच, उपयोगिता प्रमाणपत्राची एक प्रत आयुक्त तथा संचालक, नगरपरिषद प्रशासन संचालनालय, वरळी, मुंबई यांचेकडे सादर करावी.

९. दिनांक ३१ मार्च २०१८ अखेर ही निधी खर्च करण्याची मुदत संपल्यानंतर आयुक्त तथा संचालक, नगरपरिषद प्रशासन संचालनालय, वरळी, मुंबई यांनी या

लेखाशिर्षाखाली सन २०१५-२०१६ करीता वितरीत करण्यात येणा-या सर्व निधीच्या उपयोगिताचे प्रमाणपत्र प्राप्त करून घ्यावे. सदरची उपयोगिताचे प्रमाणपत्र एकत्रितरीत्या संबंधित महालेखापाल कार्यालयाकडे सादर करून खर्चित व अखर्चित निधीचा अहवाल शासनास सादर करावा.

**१०.** या शासन निर्णयानुसार मंजूर व वितरीत करण्यात येत असलेल्या निधीचे संबधित नागरी स्थानिक स्वराज्य संस्थेस वितरण करण्यासाठी संबधित जिल्हाधिकारी यांना नियंत्रक अधिकारी तसेच, संबधित जिल्हा प्रशासन अधिकारी यांना आहरण व संवितरण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे. सोबत जोडलेल्या अनुसूचीमधील रकाना क्र. (८) मधील राज्य शासनाच्या हिस्स्याचा निधी संबधित जिल्हाधिकारी यांचेकडे नियंत्रक अधिकारी म्हणून वर्ग करण्यात येत आहे. आहरण व संवितरण अधिकारी यांनी सदरचा निधी आहरीत करून सदरच्या कार्यान्वयन यंत्रणेस वितरीत करावा.

**११.** सदर शासन निर्णयान्वये वितरीत करण्यात येणारा राज्य शासनाच्या हिस्स्याचा निधी कार्यान्वयन यंत्रणेच्या स्वतंत्र बँक खात्यात ठेवण्यात यावा.संबधित नगरपरिषदेचा हिस्सा व देवस्थानचा हिस्सा सदर बँक खात्यात जमा झाल्याशिवाय कोणत्याही कामास सुरवात करू नये.याबाबतची खातरजमा संबधित जिल्हाधिकारी यांनी करून घ्यावी.

**१२.** संदर्भाधीन क्र. (१), (२) व (३) येथील शासन निर्णयान्वये "नगरपरिषद क्षेत्रातील यात्रास्थळांच्या विकास कार्यक्रमासाठी सहायक अनुदान" या योजनेस प्रशासकीय मान्यता देण्यात आली असून, सदर शासन निर्णयातील सर्व अटी व शर्ती बंधनकारक राहतील. सदरच्या अटी व शर्तींची पुर्तता व प्रकल्पास सक्षम प्राधिका-यांची तांत्रिक व प्रशासकीय मान्यता प्राप्त करून घेण्यात यावी.

**१३.** या शासन निर्णयान्वये निधी वितरीत करावयाच्या नागरी स्थानिक स्वराज्य संस्थाना या लेखाशिर्षाखाली सन २०१४-२०१५ करीता वितरीत केलेल्या निधीपैकी १००% खर्चाचे विनियोग झाले असल्याची खातरजमा आहरण व संवितरण अधिकारी यांनी करावी व असे उपयोगिता प्रमाणपत्र देयकासोबत जिल्हा कोषागारात सादर करावे.

**१४.** या लेखाशिर्षाखाली यापूर्वी वितरीत केलेल्या निधीच्या अनुषंगाने लेखापरीक्षक / महालेखापाल यांच्याकडून कोणतेही गंभीर आक्षेप नाहीत याची खातरजमा आहरण

व संवितरण अधिका-याने करावी.असे गंभीर आक्षेप असल्यास निधी आहरीत करू नये.

**१५.** या लेखाशिर्षाखाली एक वर्षावरील जुने संक्षिप्त देयक प्रलंबित असल्यास निधी आहरीत करू नये.असे प्रस्ताव वित्त विभागाची सहमती घेण्यासाठी नगर विकास विभागाकडे पाठविण्यात यावेत.

**१६.** आहरण व संवितरण अधिका-याने सदरचे आहरीत करण्यात येणारे अनुदान तात्काळ संबधितास वितरीत करावे. सदरचे अनुदान दिनांक ३१ मार्च २०१८ अखेर खर्ची पडेल याची दक्षता घ्यावी. दिनांक ३१ मार्च २०१८ अखेरचा अखर्चित निधी संबधितांनी व्याजासह शासनाच्या खाती तात्काळ जमा करावा.

**१७.** राज्य शासनाकडून मंजूर करण्यात आलेला निधी संबधित कार्यान्वयन यंत्रणा यांना **कोणत्याही प्रकारची कपात न करता** वितरीत करण्यात यावा.सदरचा निधी जिल्हाधिकारी यांनी थेट वळता करू नये.

**१८.** वितरीत करण्यात येणारा निधी ठेव बांधकामाचे स्वरूपात सार्वजनिक बांधकाम विभागास प्रदान करू नये.

**१९.** या शासन निर्णयान्वये निधी वितरीत करावयाच्या नागरी स्थानिक स्वराज्य संस्थांकडे या लेखाशिर्षाखाली यापुर्वी वितरीत केलेला निधी अखर्चित असल्यास, वित्त विभागाचा शासन निर्णय क्रमांक : संकीर्ण-१०१५/प्र.क्र.१८/अर्थोपाय दिनांक २५ ऑगस्ट, २०१५ व शासन निर्णय क्रमांक : संकीर्ण-१०.०२/प्र.क्र.१२८/अर्थोपाय दिनांक ६ जून,२००८ अन्वये कार्यवाही करावी.

**२०.** वित्त विभागाचे शासन परिपत्रक अर्थसं-२०१६/प्र.क्र.८९ /अर्थ-३,दिनांक २० एप्रिल,२०१६ मधील सोबतच्या परिशिष्टाच्या अ.क्र. (९) मधील तपासणी सूचीतील अ.क्र. (५),(६),(७) व (८) तसेच, शासन परिपत्रकामधील परिच्छेद (७) ते (१८) पैकी परिच्छेद क्र. (७),(८),(१२),(१३),(१५), (१६) व (१८) लागू होत नाहीत.तसेच, वित्त विभागाचे शासन परिपत्रक संकिर्ण-२०१६/प्र.क्र.३१ /कोषा.प्रशा.-५ ,दिनांक १० मे,२०१६ च्या परिच्छेद (अ) मधील अ.क्र. (६),(८),(९) व (१०) लागू होत नाहीत.उर्वरीत बाबींची उपरोक्त परिच्छेदांनुसार पुर्तता करण्यात आली आहे.

**२१.** यासंबंधीचा खर्च मागणी क्र.एफ-२, मुख्य लेखाशिर्ष २२१७, नगर विकास, ८०, सर्वसाधारण, १९२, नगरपरिषदांना सहाय्य, (००) (१४) नगरपरिषद क्षेत्रातील यात्रास्थळांच्या विकास कार्यक्रमासाठी सहायक अनुदान , ३१ , सहायक अनुदाने

(वेतनेतर) , (२२१७ ०९५१), या लेखाशिर्षाखाली सन २०१६-२०१७ मधील मंजूर तरतुदीमधून भागविण्यात यावा.

**२२.** वित्त विभागाचे शासन परिपत्रक क्रमांक अर्थसं-२०१६/प्र.क्र.८९ /अर्थ-३,दिनांक २० एप्रिल,२०१६ व वित्त विभागाचे शासन परिपत्रक क्रमांक अर्थसं-२०१७/प्र.क्र.८९ /अर्थ-३,दिनांक ८ फेब्रुवारी,२०१७ नुसार विभागास प्रदान करण्यात आलेल्या वित्तीय अधिकारानुसार सदरचा शासन निर्णय निर्गमित करण्यात येत आहे.

**२३.** सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१७०३२४१२४००६०४२५ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Vivek Shankar Kumbhar

Digitally signed by Vivek Shankar Kumbhar
DN: CN = Vivek Shankar Kumbhar, C = IN, S = Maharashtra, O = Government Of Maharashtra, OU = UNDER SECRETARY
Date: 2017.03.24 13:08:31 +05'30'

(विवेक कुंभार)

**अवर सचिव,महाराष्ट्र शासन**

प्रत,

१. मा.मुख्यमंत्री यांचे सचिव, मंत्रालय, मुंबई-३२
२. आयुक्त तथा संचालक, नगरपरिषद प्रशासन संचालनालय,वरळी, मुंबई-१८
३. विभागीय आयुक्त,औरंगाबाद,नाशिक व नागपूर
४. जिल्हाधिकारी, जालना,अहमदनगर व नागपूर
५. मा.राज्यमंत्री (नगरविकास) यांचे खाजगी सचिव
६. महालेखापाल, महाराष्ट्र-१, मुंबई,
७. महालेखापाल, महाराष्ट्र-२, नागपूर,
८. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई,
९. सह संचालक, लेखा व कोषागारे, संगणक कक्ष, नवीन प्रशासकीय इमारत, मुंबई.
१०. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई निवासी लेखा परिक्षा अधिकारी, मुंबई
११. जिल्हा कोषागार अधिकारी, जालना,अहमदनगर व नागपूर

१२. जिल्हा प्रशासन अधिकारी, जालना,अहमदनगर व नागपूर

१३. मुख्याधिकारी, जालना नगरपरिषद,पाथर्डी नगरपरिषद,वाडी नगरपरिषद व हिंगणा नगरपंचायत.

१४. वित्त विभाग, व्यय-३/ कोषा प्रशासन-५/अर्थसं-१६/नियोजन विभाग मंत्रालय, मुंबई.

१५. कार्यासन नवि-४ नगरविकास विभाग, मंत्रालय, मुंबई.

१६. निवड नस्ती (नवि-१६), नगरविकास विभाग, मंत्रालय, मुंबई.

शासन निर्णय क्रमांक-नपाया-२०१७/प्र.क्र.२५/नवि-१६, दिनांक :- २४ मार्च , २०१७

सोबतची कामाची अनुसूची

| अ. क्र. | जिल्हा | नगरपरिषद /नगरपंचायत | तीर्थक्षेत्राचे नाव | वर्ग वारी | सादर प्रकल्प (रू.) | मंजूर प्रकल्प (रू.) | राज्य शासनाचा हिस्सा (७५%) | नगर-परिषदेचा हिस्सा (१२.५०%) | देवस्थान हिस्सा (१२.५०%) |
|---|---|---|---|---|---|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ | ५ | ६ | ७ | ८ | ९ | १० |
| १ | नागपूर | हिंगणा नगरपंचायत | श्री.क्षेत्र गणेश मंदिर हनुमानगड | "क" | १,९८,९३,०६० | १,९८,९३,०६० | १,४९,१९,७९६ | २४,८६,६३२ | २४,८६,६३२ |
| २ | नागपूर | वाडी नगरपरिषद | महाप्रज्ञा बुद्ध विहार, धम्मकिर्ती नगर | "क" | १,६०,५३,१०१ | १,६०,५३,१०१ | १,२०,३९,८२५ | २०,०६,६३८ | २०,०६,६३८ |
| ३ | नागपूर | वाडी नगरपरिषद | हनुमान मंदिर देवस्थान, मारोती नगर | "क" | १,०९,०३,००० | १,०९,०३,००० | ८१,७७,२५० | १३,६२,८७५ | १३,६२,८७५ |
| ४ | जालना | जालना नगरपरिषद | श्री. गुरूगणेश मंदिर | "क" | १,५३,९३,५४६ | १,५३,९३,५४६ | १,१५,४५,१६० | १९,२४,१९३ | १९,२४,१९३ |
| ५ | जालना | जालना नगरपरिषद | नालंदा बुद्धविहार | "क" | १,४१,२१,१३९ | १,४१,२१,१३९ | १,०५,९०,८५५ | १७,६५,१४२ | १७,६५,१४२ |
| ६ | अहमद-नगर | पाथर्डी नगरपरिषद | श्री.खोलेश्वर मंदिर | "क" | १,४३,२४,००० | १,४३,२४,००० | १,०७,४३,००० | १७,९०,५०० | १७,९०,५०० |
| **एकूण** | | | | | ९,०६,८७,८४६ | ९,०६,८७,८४६ | ६,८०,१५,८८६ | १,१३,३५,९८० | १,१३,३५,९८० |